राज्य व्यवस्थापन कक्ष - ग्रामीण गृहनिर्माण
अंतर्गत पद निर्मिती

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०१७/प्र.क्र.५९/योजना-१०**
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: २७ जून, २०१७

**वाचा:-**

**१) शासन निर्णय क्रमांकः इंआयो २०१५/प्र.क्र.२४०/योजना-१०, दिनांक १६.७.२०१५**
**२) शासन निर्णय क्रमांक : इंआयो-२०१५/प्र.क्र.२००/योजना-१० दिनांक ३०.१२.२०१५**
**३) शासन निर्णय क्रमांकः इंआयो २०१५/प्र.क्र.४१३/योजना-१०, दिनांक १०.२.२०१६**
**४) शासन निर्णय क्रमांक : प्रआयो-२०१६/प्र.क्र.३३३/योजना-१० दिनांक १४.१०.२०१६**
**५) मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तर सचिव समितीच्या दिनांक १९.५.२०१७ च्या बैठकीचे इतिवृत्त.**

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने "सर्वांसाठी घरे-२०२२" हा महत्वाकांक्षी कार्यक्रम सुरू केला आहे. राज्य शासनाने देखील ग्रामीण गृहनिर्माण कार्यक्रमास विशेष महत्व दिले आहे. सद्या राज्यात केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (पूर्वीची इंदिरा आवास योजना) बरोबरच सामाजिक न्याय विभागाची रमाई आवास योजना, आदिवासी विकास विभागाच्या शबरी, आदिम, पारधी आवास योजना, गृहनिर्माण विभागाची राजीव गांधी निवारा योजना क्र.१ अशा स्वरूपाच्या ग्रामीण गृहनिर्माण योजना राबविल्या जातात. सदर योजनांतर्गत दरवर्षी रु. १००० कोटींच्या वर निधी खर्च करण्यात येतो. तसेच साधारणत: दरवर्षी दोन लाखाच्या वर घरकुले बांधण्यात येतात.

तसेच ग्रामीण घरकुल योजनेतील घरकुल पात्र परंतु घरकुल बांधकामासाठी स्वत:ची जागा नसलेल्या कुटूंबांना जागा खरेदी करण्यासाठी "पंडीत दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय योजना" संदर्भीय क्र. २ येथील शासन निर्णयान्वये सुरू केली आहे.

केंद्र पुरस्कृत इंदिरा आवास योजनेची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी "राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना" कक्ष वरील संदर्भीय क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आला आहे. केंद्र पुरस्कृत इंदिरा आवास योजनेबरोबरच इतर राज्य पुरस्कृत योजना व पंडीत दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय योजनांची राज्यात प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी "राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना" कक्षाचे रुपांतर "राज्य व्यवस्थापन कक्ष - ग्रामीण गृहनिर्माण" कक्षामध्ये करण्याचा निर्णय संदर्भीय क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे.

केंद्र शासनाने सन २०१६-१७ पासून इंदिरा आवास योजनेचे रुपांतर प्रधानमंत्री आवास योजनामध्ये करण्याचा निर्णय घेतला आहे. त्यानुसार सदर योजना राज्यात राबविण्याबाबतचा निर्णय राज्य शासनाने वरील संदर्भीय कमांक ४ अन्वये घेतला आहे. "राज्य व्यवस्थापन कक्ष - ग्रामीण गृहनिर्माण" यांच्यामार्फत केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) व अन्य राज्य पुरस्कृत ग्रामीण घरकुल योजना व पंडीत दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय योजना राबविली जाते. त्यामुळे राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण कक्षाचा वाढलेल्या कामाचा व्याप विचारात घेऊन ग्रामीण घरकुल योजनांची प्रभावी अंमलबजावणी व सनियंत्रण होण्यासाठी पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

"राज्य व्यवस्थापन कक्ष - ग्रामीण गृहनिर्माण" यांच्यामार्फत केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) व अन्य राज्य पुरस्कृत ग्रामीण घरकुल योजना व पंडीत दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय योजना राबविल्या जातात. त्यामुळे राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण कक्षाचा वाढलेल्या कामाचा व्याप विचारात घेऊन ग्रामीण घरकुल योजनांची प्रभावी अंमलबजावणी व सनियंत्रण होण्यासाठी सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये दर्शविलेली पदे निर्माण करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

सदर पदांवर होणारा खर्च राज्य व्यवस्थापन कक्ष - ग्रामीण गृहनिर्माणसाठी प्रशासकीय खर्चाकरीता उपलब्ध होणाऱ्या अनुज्ञेय निधीतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर पदे भरण्याचे अधिकार संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष - ग्रामीण गृहनिर्माण यांना देण्यात येत आहे. प्रचलित नियम व धोरणांनुसार सदरची पदे भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

राज्य व्यवस्थापन कक्ष - ग्रामीण गृहनिर्माण करीता निर्माण करण्यात येणारी सर्व पदे योजनेशी संलग्न आहेत. ही पदे कायमस्वरुपी नसून या योजना चालू असेपर्यंतच अस्तित्वात राहातील.

राज्य व विभाग स्तरावरील पदे भरण्याबाबतची कार्यवाही संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण यांनी करावी. तर जिल्हा व तालुका स्तरावरील पदे भरण्याबाबतची कार्यवाही संबंधित जिल्हयाच्या मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी करावी.

जिल्हा व तालुका स्तरावरील पदे भरतीबाबतच्या सविस्तर सुचना संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण यांनी निर्गमित कराव्यात.

सदरचा शासन निर्णय मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२३१६५७५५६७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aseem Gupta

Digitally signed by Aseem Gupta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42cb1d992ceadc1f5fea3c14e1cedf9b5ea392a9c81fdbde5629e68c9158678b, cn=Aseem Gupta
Date: 2017.06.27 16:13:58 +05'30'

**असीम गुप्ता**
सचिव, ग्रामविकास विभाग

प्रत,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.विरोधी पक्ष नेता, विधान सभा/ विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) सर्व विधानसभा व विधान परिषद सदस्य
६) मा.मुख्य सचिव, यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
८) महालेखापाल (लेखापरीक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.
१०) महालेखापाल (लेखापरिक्षण), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३) अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (सर्व)
१४) सर्व विभागीय आयुक्त
१५) सर्व जिल्हाधिकारी
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य जीवनन्योती अभियान, सी.बी.डी.बेलापूर, नवी मुंबई
१८) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, सी.बी.डी.,बेलापूर, नवी मुंबई
१९) संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२०) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक

२१) ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व सह/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, मंत्रालय, मुंबई
२२) उप सचिव, सामाजिक न्याय, आदिवासी विकास, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२३) उप सचिव, नियोजन (का.१४११ व १४१४) व वित्त विभाग (का.व्यय-१५ व अर्थ-१७) मंत्रालय, मुंबई
२४) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
२५) गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
२६) अतिरिक्त संचालक, एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
२७) निवड नस्ती (कार्यासन योजना-१०)

## परिशिष्ट-अ

## शासन निर्णय क्रमांक:प्रआयो २०१७/प्र.क्र.५९/यो-१०, दिनांक २७ जून, २०१७ सोबतचे सहपत्र

## केंद्र पुरस्कृत प्रधान मंत्री आवास योजना (ग्रामीण) व इतर ग्रामीण गृहनिर्माण योजनांची तसेच पंडित दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय्य योजनांची प्रभावी अंमलबजवणी करण्यासाठी राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण अंतर्गत निर्माण करावयाची पदे

| **प्रतिनियुक्तीने भरावयाची पदे** | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | अर्हता | नियुक्तीचा प्रकार | वेतन/मानधन |
| १ | उप संचालक, राज्य योजना | १ | ----- | महाराष्ट्र विकास सेवा वर्ग-१ मधून प्रतिनियुक्तीने | १५६०० - ३९१०० ग्रेड पे ५४००/- |
| २ | सहायक संचालक लेखा (राज्य योजना) | १ | ------ | महाराष्ट्र लेखा व कोषागार सेवेतील वर्ग-१ मधून प्रतिनियुक्तीने | १५६०० - ३९१०० ग्रेड पे ५४००/- |
| ३ | संनियंत्रण अधिकारी (मविसे वर्ग-२) पंडीत दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय योजना | १ | ------ | महाराष्ट्र विकास सेवा वर्ग-२ मधून प्रतिनिुयक्तीने | ९३०० - ३४८०० ग्रेड पे ४४००/- |
| ४ | कार्यालयीन अधीक्षक | १ | ------ | जिल्हा परिषदेकडील अधीक्षक पदामधून प्रतिनियुक्तीने | ९३०० - ३४८०० ग्रेड पे ४२००/- |
| ५ | सहायक लेखाधिकारी | १ | ------ | जिल्हा परिषद /महाराष्ट्र विकास सेवा वर्ग-३ मधून प्रतिनियुक्तीने | ९३०० - ३४८०० ग्रेड पे ४३००/- |
| ६ | वरिष्ठ लेखा लिपिक | १ | ------- | महाराष्ट्र विकास सेवा वर्ग-३ मधून प्रतिनियुक्तीने | ५२०० - २०२०० ग्रेड पे २४००/- |
| | **एकूण** | **६** | | | |

| बाह्ययंत्रणेद्वारे भरावयाची काल्पनिक पदे (राज्यस्तर) | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | अर्हता | नियुक्तीचा प्रकार | वेतन/मानधन |
| १ | सहायक | २ | (१) कोणत्याही शाखेचा पदव्युत्तर<br>(२) वय ३५ वर्षापेक्षा जास्त नसावे<br>(३) शासकीय/बीगर शासकीय संस्थेत प्रशासकीय कामाचा ५ वर्षाचा अनुभव<br>(४) MS-CIT उत्तीर्ण<br>(५) टंकलेखक मराठी ३० व इंग्रजी ४० मिनिट प्रती शब्द | बाह्ययंत्रणेद्वारे | २५०००/- |
| २ | प्रशिक्षण समन्वयक (IT) | ६ | (१)पदव्युत्तर पदवी समाजशास्त्र/ ग्रामीण व्यवस्थापन/ लोक प्रशासन किंवा शासन मान्यता प्राप्त संस्थेचा MBA (मनुष्य संसाधन)<br>(२) संगणकाचे ज्ञान आवश्यक (MS- OFFICE) (कमीत कमी १ वर्षचा अनुभव) | बाह्ययंत्रणेद्वारे | ४००००/- |
| ३ | राज्य समन्वयक (IT) | २ | (१) BE-Computer Sciences/MMS Systems (कमीत कमी ५ वर्षे शासकीय कामाचा अनुभव) | बाह्ययंत्रणेद्वारे / कंत्राटी | ५००००/- |
| ४ | राज्य समन्वयक (MIS) राज्य योजना | १ | (१) कॉम्प्युटर सायन्समधील पदवी अथवा पदव्युत्तर पदवी/ कोणत्याही शाखेतील पदवीनंतर २ वर्षाचा कॉम्प्युटर सायन्स मधील डिप्लोमा (कमीत कमी २ वर्षाचा अनुभव) | बाह्ययंत्रणेद्वारे | ४००००/- |
| ५ | डाटा एन्ट्री ऑपरेटर | ११ | (१) पदवीधर (कोणत्याही शाखेचा) टंकलेखक इंग्रजी प्रतिमिनीटास ४० शब्द व मराठी प्रतिमिनीटास ३० शब्द इतक्या गतीचे प्रमाणपत्र<br>(२) एम.एस.सी.आय.टी. संगणक परीक्षा उत्तीर्ण (कमीत कमी १ वर्षाचा अनुभव) | बाह्ययंत्रणेद्वारे | १७०००/- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ६ | लघुटंकलेखक | १ | (१) पदवीधर (कोणत्याही शाखेचा) इंग्रजी किंवा मराठी लघुलेखनातील दर मिनीटास १०० शब्द कमी नसेल इतक्या गतीने आणि इंग्रजी टंकलेखनातील दर मिनीटास ४० शब्दांहून किंवा मराठी टंकलेखनातील दर मिनीटास ३० शब्दांहून कमी नसेल इतक्या गतीचे प्रमाणपत्र (कमीत कमी १ वर्षाचा अनुभव) | बाह्ययंत्रणेद्वारे | २००००/- |
| ७ | शिपाई | २ | (१) SSC उत्तीर्ण (कमीत कमी १ वर्ष कामाचा अनुभव) | बाह्ययंत्रणेद्वारे | १४०००/- |
| | **एकूण** | **२५** | | | |
| **बाह्ययंत्रणेद्वारे भरावयाची काल्पनिक पदे (विभागस्तर)** | | | | | |
| **अ.क्र.** | **पदनाम** | **पदसंख्या** | **अर्हता** | **नियुक्तीचा प्रकार** | **वेतन/मानधन** |
| १ | प्रोग्रॅमर | ६ | (१) BCA/BCS/MCS/MSC Computer (कमीत कमी १ वर्षाचा अनुभव) | बाह्ययंत्रणेद्वारे | २२०००/- |
| | **एकूण** | **६** | | | |
| बाह्ययंत्रणेद्वारे भरावयाची काल्पनिक पदे (जिल्हास्तर) | | | | | |
| **अ.क्र.** | **पदनाम** | **पदसंख्या** | **अर्हता** | **नियुक्तीचा प्रकार** | **वेतन/मानधन** |
| १ | प्रोग्रॅमर | ३४ | (१) BCA/BCS/MCS/MSC Computer (कमीत कमी १ वर्षाचा अनुभव) | बाह्ययंत्रणेद्वारे | २००००/- |
| २ | डाटा एन्ट्री ऑपरेटर | ३४ | (१) पदवीधर (कोणत्याही शाखेचा) टंकलेखक इंग्रजी प्रतिमिनीटास ४० शब्द व मराठी प्रतिमिनीटास ३० शब्द इतक्या गतीचे प्रमाणपत्र<br>(२) एम.एस.सी.आय.टी. संगणक परीक्षा उत्तीर्ण (कमीत कमी १ वर्षाचा अनुभव) | बाह्ययंत्रणेद्वारे | १५०००/- |
| | **एकूण** | **६८** | | | |

| बाह्ययंत्रणेद्वारे भरावयाची काल्पनिक पदे (तालुकास्तर) | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | अर्हता | नियुक्तीचा प्रकार | वेतन/मानधन |
| १ | डाटा एन्ट्री ऑपरेटर | ३५३ | १) पदवीधर (कोणत्याही शाखेचा) टंकलेखक इंग्रजी प्रतिमिनीटास ४० शब्द व मराठी प्रतिमिनीटास ३० शब्द इतक्या गतीचे प्रमाणपत्र<br>२) एम.एस.सी.आय.टी. संगणक परीक्षा उत्तीर्ण (कमीत कमी १ वर्षाचा अनुभव) | बाह्ययंत्रणेद्वारे | १५०००/- |
| | **एकूण** | **३५३** | | | |